योजनेतर (Non Plan) वैधानिक विकास मंडळ निहाय प्रत्यक्ष खर्च हा अविभाज्य भागासह विधानमंडळास सादर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र. २३ /अर्थ-१.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १४ मार्च, २०१७

**वाचा**: - शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: संकीर्ण-२०१४/प्र.क्र.४/अर्थ-१, दिनांक : ८ मे, २०१४.

## परिपत्रक

योजनेतर (Non Plan) वैधानिक विकास मंडळ निहाय प्रत्यक्ष खर्च हा अविभाज्य भागासह विधानमंडळास सादर करणे आवश्यक आहे. सन २०१७-१८ चे अर्थसंकल्पीय अधिवेशन दि. ६.३.२०१७ रोजी सुरु होत आहे. येत्या अर्थसंकल्पीय अधिवेशनामध्ये ज्या वित्तीय वर्षाचा अर्थसंकल्प मांडण्यात येईल त्या वित्तीय वर्षाच्या लगतच्या पूर्वीच्या वर्षाची म्हणजेच सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाची योजनेतर (Non Plan) वैधानिक विकास मंडळ निहाय प्रत्यक्ष खर्चाची माहिती (आविभाज्य भागासह) विधानमंडळास सादर करणे आवश्यक आहे. सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या विभागाशी संबंधित योजनेतर वैधानिक विकास मंडळ निहाय प्रत्यक्ष खर्चाची माहिती विभाग निहाय,उपविभाग निहाय सादर न करता, म्हणजे अर्थसंकल्पीय (White Book) पुस्तकानुसार एकाच नमुन्यात व अर्थसंकल्पावरील सर्वसाधारण चर्चेपूर्वी स्वतंत्ररित्या (कार्यक्रम अंदाजपत्रकात न दर्शविता स्वतंत्रपणे) सभागृहाच्या पटलावर सादर करणे आवश्यक असल्याच्या सूचना वर नमूद दि. ८ मे, २०१४ च्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत.

२. आर्थिक वर्ष २०१७-१८ पासून योजनांतर्गत व योजनेतर खर्चाचे एकत्रिकरण करणेबाबत दि. २७ जानेवारी, २०१७ च्या शासन निर्णयामधील तरतूदी ह्या सन २०१७-१८ या आर्थिक वर्षापासून लागू होणार असल्याने दि. ८ मे, २०१४ च्या परिपत्रकात दिलेल्या सूचना विचारात घेऊन सर्व प्रशासकीय विभागांनी **पूर्वी प्रमाणेच** सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या योजनेतर वैधानिक विकास मंडळ निहाय कार्यक्रमावरील प्रत्यक्ष खर्चाची माहिती (अविभाज्य भागासह) सन २०१७ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात विधानमंडळाच्या सर्वसाधारण चर्चेच्यापूवी दोन्ही पटलावर ठेवावी.

३. योजनेतर वैधानिक विकास मंडळ निहाय प्रत्यक्ष खर्चाची माहिती (आविभाज्य भागासह) विधानमंडळास सादर करण्याची सर्वस्वी जबाबदारी सर्व प्रशासकीय विभागाची राहील, याची कृपया नोंद घ्यावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०३१४१७५६०९५२०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant K. Patil

Digitally signed by Vasant K. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=FINANCE DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16a60323ef3beff915e7cf13b9836a7df2ad6df610965aab153a71bdb81c36c1, cn=Vasant K. Patil
Date: 2017.03.14 17:57:18 +05'30'

**( व. कृ. पाटील )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
५. सर्व सह सचिव / उप सचिव ( अर्थसंकल्प शाखा ), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, मुद्रण व लेखन सामुग्री संचालनालय, चर्नी रोड, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (व्हीएलसी शाखा) महाराष्ट्र, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)(व्हीएलसी शाखा) महाराष्ट्र, नागपूर.
९. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र, नागपूर.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१३. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. स्वीय सहाय्यक, मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती, अर्थसंकल्प-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.